**वनक्षेत्राचे सर्वेक्षण, सिमांकन व जमाबंदी या योजनेत्तर योजनेखाली १८ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एस-१०/२०२२/प्र.क्र.६०/फ-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : १४ मार्च, २०२२.

पहा :-

१) महसूल व वन विभागाचे शासन निर्णय क्र. एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दिनांक १३.०९.२०१९ व दिनांक २१.०९.२०२१.
२) शासन निर्णय महसूल व वन विभाग, क्रमांक एस-१०/२०२१/प्र.क्र.२५०/फ-३, दिनांक १६.०३.२०२१ व दिनांक १३.०९.२०२१.
३) वित्त विभागाचे शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक २२.०२.२०२२.
४) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-३/योजनेत्तर/प्र.क्र.२०/२१-२२/२७०; दिनांक १०.०२.२०२२.

**शासन निर्णय :**

वनक्षेत्राचे सर्वेक्षण, सिमांकन व जमाबंदी या योजनेत्तर योजनेखालील २० अस्थायी पदे दिनांक २८.२.२०२२ पर्यंत चालू ठेवण्यास शासनाने संदर्भ क्रमांक २ च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे.

वन विभागातील पदांच्या आढाव्याअंती संदर्भ क्र. २ च्या दिनांक १३.०९.२०१९ व दिनांक २१.०९.२०२१ च्या शासन निर्णयान्वये मान्य केलेल्या सुधारित आकृती बंधातील २६५७३ पदांमध्ये सदर योजनेतंर्गत २० अस्थायी पदांपैकी १८ अस्थायी पदांचा समावेश आहे. तर वाहन चालक - १ पद, पहारेकरी- १ पद असे एकूण २ पदे निरसित करण्यात आलेली आहेत. त्यानुषंगाने खालील विवरणपत्र अ मध्ये दर्शविलेल्या १८ अस्थायी पदांना आता दिनांक २८.०२.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्याची प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र. ५ अन्वये विनंती केली आहे.

**विवरणपत्र अ**

| अ.क्र. | पदनाम | पद संख्या | पदांचा वृत्तनिहाय तपशील |
|---|---|---|---|
| १ | वनजमाबंदी अधिकारी | ४ | (पुणे-१ /औरंगाबाद-१ / ठाणे-१/ नागपूर-१) |
| २ | वनपाल | १ | (ठाणे-१) |
| ३ | मंडळ अधिकारी | १ | (पुणे-१) |
| ४ | लेखापाल | १ | (पुणे-१) |
| ५ | वनसर्व्हेक्षक | ५ | (पुणे-१/ठाणे-३/औरंगाबाद-१) |
| ६ | वनक्षेत्रसर्व्हेक्षक | १ | (पुणे-१) |
| ७ | चेनमन | २ | (ठाणे-२) |
| ८ | चपराशी/ शिपाई | २ | (पुणे-१ / प.मुंबई (वन्यजीव)-१) |
| ९ | जीपचालक | १ | (पुणे-१) |
| एकूण | | **१८ पदे** | |

२. वित्त विभागाच्या दिनांक २२.०२.२०२२ च्या शासन निर्णयानुसार प्रशासकीय विभागांना त्यांच्या अधिनस्त अस्थायी पदांना दिनांक ३१.०८.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. त्यानुसार सोबत जोडलेल्या विवरणपत्र मध्ये दर्शविल्यानुसार १८ अस्थायी पदांना **दिनांक १.०३.२०२२ ते दिनांक ३१.०८.२०२२** या कालावधीकरिता खालील अटीं व शर्तींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे.

अ) सदर १८ अस्थायी पदे ६ महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी रिक्त नाहीत.

ब) सदर १८ अस्थायी पदे भूमी अभिलेख कार्यालयातील असून ती वन विभागातील पदांच्या आढाव्याअंती संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मान्य केलेल्या आकृतीबंधातील पदांमध्ये समाविष्ट असणे आवश्यक आहे.

३. या पदावर होणारा खर्च प्रधान शिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर), ०१ वनीकरण, १०१ वनसंधारण विकास व पुननिर्मिती (०१) (०२) वनांचे सर्वेक्षण, जमाबंदी व सिमांकन (२४०६ ०१०२) या लेखाशिर्षा खाली सन २०२२-२३ या वित्तीय वर्षातील मंजूर होणाऱ्या अनूदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक २२.०२.२०२२ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३१५१४४२५१२६१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

RAVIKIRAN SABAJI GOVEKAR

Digitally signed by RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
DN: c=IN, o=Personal,
pseudonym=bb348b74c34d5cdc104457bb077cbbab2753fda99613688793f8ffb2d4595af5,
2.5.4.20=d399ba42648ff6007bc88b201ae47aa7d8a80a09e22cffd4c08887e4e01ce080, postalCode=416519, st=MAHARASHTRA,
serialNumber=b752370b557d0a3e58b4b069230bc54f6a13d04798d2ee7a3f1c7dcc5655271c, cn=RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
Date: 2022.03.15 14:46:40 +05'30'

**( डॉ. रविकिरण गोवेकर )**
**मुख्य वनसंरक्षक ( मंत्रालय)**

<u>प्रति</u>,

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. सर्व विभागीय आयुक्त.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम मुंबई.
५. मुख्य वनसंरक्षक, ठाणे/ पुणे/ नागपूर/औरंगाबाद.
६. वनजमाबंदी अधिकारी, भोर /औरंगाबाद/कोंकण, नागपूर.
७. महालेखापाल-१ (लेखा परिक्षा) / (लेख व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. महालेखापाल-२ (लेखा परिक्षा) / (लेख व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
९. नियोजन विभाग, (योजना-१४), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. वित्त विभाग, व्यय-१०, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
११. ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१२. फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१३. निवडनस्ती, फ-३ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.